**महाराष्ट्र नगरपरिषद व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ नुसार नगरपालिका क्षेत्रातील स्थावर मालमत्तांच्या हस्तांतरणावर वसूल केलेला १% अतिरिक्त शुल्क (अधिभार) संबंधीत नगरपरिषदांना सहाय्यक अनुदान म्हणून वितरीत करणेबाबत..(सन २०१४-१५)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१३/नवि-१६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २० मार्च, २०१५

**संदर्भ** :- १) सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचलनालय, यांचे पत्र क्र.नपप्रसं-२०१४-१५/अर्थसंकल्पीय अंदाज/ प्र.क्र.५४/का-८ दि.१७/१/२०१५ व त्यासोबत नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे पत्र क्र.का-७/न.प.प्र./संचलानलय/५२८/१३ दिनांक १२/६/२०१४

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३ दिनांक ०२ जानेवारी २०१५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र नगरपरिषदा व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ चे कलम १४७-क (१) अन्वये नगरपालिका क्षेत्रातील लेखाच्या बाबतीत, अशा प्रकारे नगरपालिका क्षेत्रात असलेल्या मालमत्तेच्या विक्रीच्या किंवा दानाच्या बाबतीत, त्या मालमत्तेच्या मूल्यावर आणि उपभोग्य गहाणविषयक लेखाच्या बाबतीत, त्या लेखामध्ये नमूद केल्याप्रमाणे, त्या लेखाद्वारे प्रतिभूत केलेल्या रकमेवर १% अधिभार शुल्क आकारले जाते व यातील पोटकलम (३) अन्वये असा अधिभार म्हणून वसूल करण्यात आलेल्या अतिरिक्त शुल्काच्या रकमेएवढी अदमासे रक्कम सहायक अनुदान म्हणून संबंधीत नगरपरिषदांना वितरीत करण्याची तरतूद आहे.

**शासन निर्णय :-**

उक्त संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावास अनुलक्षून व महाराष्ट्र नगरपरिषदा व औद्योगिक नगरी अधिनियमातील उक्त नमूद तरतुदीनुसार तसेच सन २०१४-१५ करिता वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.०२ येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या (८५%) मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजुरी दिलेली असून, त्यानुसार लेखाशीर्ष ३६०४०१६५ या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतूद रु.८५,००,००,०००/- (रुपये पंचाऐंशी कोटी फक्त) इतकी रक्कम नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांनी उक्त संदर्भाधीन दिनांक १२/६/२०१४ च्या पत्रामध्ये प्रमाणीत केलेल्या संबंधीत नगरपरिषदांना त्या प्रमाणात वितरीत करण्यासाठी आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचलनालय, वरळी यांचेकडे या शासन निर्णयान्वये सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

०२. सदरील निधी आहरित करुन वितरीत करण्यासाठी सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व उप संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०३. याकरिता होणारा खर्च “ मागणी क्रमांक-एफ-०४, ३६०४-स्थानिक, स्वराज्य संस्था व पंचायत राज्य संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान

भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा, (००)(०४) नगरपालिका क्षेत्रामध्ये असलेल्या स्थावर मालमत्तेच्या विवक्षित हस्तांतरणाकरिता मुद्रांक शुल्क बसविण्यासाठी नगरपरिषदांना सहायक अनुदानाचे प्रदान (३६०४०१६५) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१००/व्यय-३, दिनांक २०/२/२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२७१५४९५८२५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Shashikant Narhari Yoge

Digitally signed by Shashikant Narhari Yoge
DN: CN = Shashikant Narhari Yoge, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2015.03.27 15:59:39 +05'30'

**(शशिकांत योगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
५) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
६) कार्यासन व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) कार्यासन नवि-४ / संगणक कक्ष/ नवि-३१, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी,
९) निवडनस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.